रंगभूमी प्रयोग परिनिरीक्षण मंडळ, मुंबई कार्यालयातील अस्थायी पदांना दिनांक ०१.०३.२०२३ ते दिनांक ३१.०८.२०२३ या कालावधीकरीता मुदतवाढ देणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः एसपीबी -२०२३/प्र.क्र.१६/सां.का-१**
मंत्रालय विस्तार, मादाम कामा मार्ग,
हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई-४०० ०३२
दिनांक : १७ फेब्रुवारी, २०२३

वाचा :-

१) शासन निर्णय, सामाजिक न्याय, सांस्कृतिक कार्य व विशेष सहाय्य विभाग, क्र. संकीर्ण-२००१/प्र.क्र.२९८/सां.का-१, दिनांक २३ मार्च, २००६.
२) शासन निर्णय, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, क्र. एसपीबी-२०२२/प्र.क्र.२०/सां.का-१, दिनांक २१ सप्टेंबर, २०२२.
३) वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक:पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि.०८.०२.२०२३.
४) सचिव, रंगभूमी प्रयोग परिनिरीक्षण मंडळ, मुंबई यांचे पत्र क्र. रँप्रपम/आस्था/२०२३/६०२ दिनांक ०९.०२.२०२३.

**शासन निर्णयः-**

रंगभूमी प्रयोग परिनिरीक्षण मंडळ, मुंबई यांच्या आस्थापनेवरील एकूण ०४ नियमित पदे व ०१ ठोक मानधनावरील अस्थायी पदांना संदर्भ क्र.२ येथील शासन निर्णयान्वये दि.०१.०९.२०२२ ते दि.२८.०२.२०२३ पर्यंत चालू ठेवण्यास मंजूरी देण्यात आली होती. तथापि, वित्त विभागाने त्यांच्या संदर्भ क्रमांक-३, दि.०८.०२.२०२३ रोजीच्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय विभागाच्या अखत्यारितील कार्यालयाच्या आस्थापनेवरील अस्थायी पदांना तसेच यापूर्वी आढावा मंजूर केल्यानंतर निर्माण करण्यात आलेल्या सर्व अस्थायी पदांना दि.३१.०८.२०२३ पर्यंत मुदतवाढ देण्यासाठीचे अधिकार प्रदान केले असल्याने, दि.०१.०३.२०२३ ते दि.३१.०८.२०२३ पर्यंत खालील अटींच्या अधीन राहून पुढे चालु ठेवण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे:-

| अ.क्र. | पदनाम | वेतनश्रेणी | एकूण पदे | |
|---|---|---|---|---|
| | | | नियमित | ठोक मानधनावर |
| १. | लिपिक-टंकलेखक | S-६: १९९००-६३२०० | ०१ | ० |
| २. | दप्तरी | S-३: १६६००-५२४०० | ०१ | ० |
| ३. | शिपाई | S-१: १५५००-४७६०० | ०२ | ० |
| ४. | लघुलेखक | रू. २०,०००/- | ०० | ०१ |
| **एकूण** | | | **४** | **०१** |

अटी व शर्ती-

अ) ज्या प्रयोजनार्थ सदरहू पदे निर्माण केलेली आहेत, त्या प्रयोजनार्थच पदांचा विनियोग करण्यात यावा.
आ) वित्त विभागाच्या प्रचलित धोरणांनुसार सदरहू पदांपैकी कोणतेही पद सहा महिन्यांपेक्षा जास्त कालावधीसाठी रिक्त नसावे.
इ) सदरहू पदांवरील अपेक्षित खर्च मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

२. रंगभूमी प्रयोग परिनिरीक्षण मंडळ, मुंबई यांच्या आस्थापनेवरील एकूण ०४ नियमित पदे व ०१ ठोक मानधनावरील अस्थायी पदांना होणारा खर्च झेडडी-२, २२०५ कला व संस्कृती (०२) रंगभूमी प्रयोग परिनिरीक्षण मंडळाचे कार्यालय (०२), (०१) राज्य रंगभूमी प्रयोग परिनिरीक्षण मंडळ मुंबई (२२०५ १३८३) या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकून मंजूर तरतूदीतून भागविण्यात यावा.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संगणक संकेताक २०२३०२१७१५०१३८५६२३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

BALASAHEB ISHWAR SAWANT

Digitally signed by BALASAHEB ISHWAR SAWANT
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TOURISM AND CULTURAL AFFAIRS DEPARTMENT, 2.5.4.20=79fcecc76dd8693a7bfcec682ee63eee2edaf06ba586ac71715d8e6ba4d62fbe, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=327FE83917B9691D96F2C6AEB03B51A86A595CCAC9264923EA4CD090FFD03E83, cn=BALASAHEB ISHWAR SAWANT
Date: 2023.02.17 16:12:32 +05'30'

**( बाळासाहेब ईश्वर सावंत )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. सचिव, रंगभूमी परिनिरीक्षण मंडळ, मुंबई
२. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई
३. महालेखापाल, (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, मुंबई
४. लेखा व अधिदान अधिकारी, मुंबई
५. निवासी लेखा अधिकारी, मुंबई
६. वित्त विभाग (व्यय-१५), मंत्रालय, मुंबई-३२
७. अवर सचिव (अर्थसंकल्प), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
८. निवडनस्ती (सांका-१).